"लेटस चेंज हा चित्रपट राज्यातील शाळांमधून दाखविण्यास परवानगी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२३/प्र.क्र.१८/प्रशिक्षण**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
तारीख: ११ एप्रिल, २०२३

वाचा-

१) शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०१५/प्र.क्र.२७७/एस.डी.४ दि. ०७ ऑक्टोबर,२०१५.
२) शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण २०२५/(१५४/१५)/समन्वय कक्ष दि. २१ जानेवारी,२०१६.
३) श्री. समर्थ फिल्मस, नवी मुंबई यांचे दिनांक:१३.०३.२०२३ चे निवेदन.

**शासन निर्णय-**

श्री. समर्थ फिल्मस, नवी मुंबई "लेट्स चेंज" या मराठी चित्रपटास राज्यातील शाळांमधून दाखविण्यास परवानगी देण्यात यावी अशी संदर्भाधीन दिनांक १३/०३/२०२३ च्या पत्रान्वये विनंती केलेली आहे. सदर मराठी चित्रपटास राज्यातील शाळांमधील विद्यार्थी/विद्यार्थीनींना दाखविण्यास खालील अटी व शर्तीच्या आधीन राहून शैक्षणिक वर्ष सन २०२३-२४ व २०२४-२५ या दोन वर्षापुरती परवानगी देण्यात येत आहे.

**अटी:-**

१) सदर चित्रपट पाहण्याची कोणत्याही विद्यार्थ्यांना सक्ती करण्यात येणार नाही.

२) विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक अभ्यासक्रमात कोणताही अडथळा येणार नाही याची योग्य ती दक्षता घेण्यात यावी.

३) या शासन परवानगीच्या आधारे सदर चित्रपट दाखविण्याबाबत इतर दुसऱ्या कोणत्याही संस्थेबरोबर निर्माता श्री. समर्थ फिल्मस, नवी मुंबई यांना करार करता येणार नाही, किंवा प्रतिनिधी नेमता येणार नाहीत व तशी परवानगी त्यांना राहणार नाही.

४) सदरहू चित्रपट पहाण्यास इच्छुक विद्यार्थ्यांकडून रुपये २०/- (रुपये वीस फक्त) पेक्षा जास्त मुल्य आकारता येणार नाही.

५) हा चित्रपट शाळांमधून दाखविताना कोणत्याही प्रकारचा वाद उद्धभवल्यास किंवा तक्रारी प्राप्त झाल्यास सदर संस्थेस दिलेली परवानगी तात्काळ रद्द करण्यात येईल.

६) सदरील सिनेमा केंद्र सरकाच्या “स्वच्छ भारत मिशन” वर आधारीत असल्यामुळे शाळेतील सर्व मुलांना चित्रपट पाहण्यासाठी प्रोत्साहित करावे.

७) सदरिल चित्रपट हा केंद्र सरकारच्या “स्वच्छ भारत मिशन” वर आधारित असल्याने शाळांमध्ये चित्रपट दाखवल्याचा अहवाल जिल्हा संयोजकांमार्फत शिक्षण विभागाला सादर करावा.

८) सदर चित्रपट दाखविण्याची परवानगी शैक्षणिक वर्ष २०२३-२४ व २०२४-२५ पुरतीच मर्यादित राहील.

९) शालेय स्वच्छता भारत अभियानाची अमलबजावणी करण्यासाठी दि. ७ ऑक्टोबर, २०१५ च्या निर्णयान्वये "स्वच्छ विद्यालय स्वच्छ महाराष्ट्र" या कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्याविषयी सूचना देण्यात आलेल्या आहेत. सदर शासन निर्णयातील परिच्छेद क्र. ४.६ पालकांना व विद्यार्थ्यांना स्वच्छतेचे महत्व समजून सांगण्यासाठी संगणकावर फिल्म/क्लीप दाखवणे व ४.८ नुसार दर आठवड्याला प्रत्येक वर्गासाठी कार्यानुभवाचा एक तासिका स्वच्छता कार्यक्रमाकरिता वापरण्यात यावी अशाही सूचना दिलेल्या आहेत. विषयाधिन शैक्षणिक चित्रपट हा स्वच्छतेशी संबंधित असल्यामुळे वरील अटींच्या अधीन राहून चित्रपट दाखवावयाचा असल्यास सदर तासिकेचा वापर करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४१११४४७०८५९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NEHA NANDKUMAR
HUMRASKAR

Digitally signed by NEHA NANDKUMAR HUMRASKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=fad9131f2c2ae9d6d9bb053715c4b9e08b15382beb01922a7bf2c233de3f7a45, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D597D0579F83EBCFE4417B54A6F0F51D17796B044C4649DF1D9A2A0E92B2B851, cn=NEHA NANDKUMAR HUMRASKAR
Date: 2023.04.11 14:53:06 +05'30'

**( नेहा हुमरसकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. शिक्षण संचालक, (माध्यमिक व उच्च माध्यमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. शिक्षण संचालक, (प्राथमिक) शिक्षण संचालनालय, पुणे
३. संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद (विद्या परीषद), ७०८, सदाशिव पेठ कुमठेकर मार्ग, पुणे ४११०३०.
४. संचालक, राज्य शैक्षणिक तंत्रज्ञान संस्था (बालचित्रवाणी), पुणे
५. विभागीय शिक्षण उप संचालक (मुंबई/पुणे/कोल्हापूर/नाशिक/ औरंगाबाद/ लातूर/ अमरावती/ नागपूर
६. सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक) जिल्हा परिषद संचालनालयामार्फत) शिक्षण निरीक्षक, उत्तर / दक्षिण / पश्चिम मुंबई
७. श्री. समर्थ फिल्मस,ए एल १/२९६, जय किसान सो, सेक्टर १७, ऐरोली, नवी मुंबई.४०० ७०८.
८. निवड नस्ती (प्रशिक्षण).